# इटुकली मिटुकली

लेखक

साने गुरुजी












ई साहित्य प्रतिष्ठान

पुस्तकाचे नाव **इटुकली मिटुकली**

लेखकाचे नाव **साने गुरुजी**

प्रकार **गोष्टींचा खजिना**

संकलन आणि मुखपृष्ठ **अनघा हिरे**

प्रकाशक

ई साहित्य प्रतिष्ठान

esahitya@gmail .com

www.esahity.com

9869674820




ई साहित्य प्रतिष्ठान हि नोंदणीकृत संस्था असुन अनेक लेखक वाचकांनी एकत्र येऊन सुरु केली आहे. संस्थेतर्फे दर आठवड्याला एक मराठी ई पुस्तक चाळीस देशातील सुमारे दोन लाख वाचकांना विनामूल्य वितरीत केले जाते . त्या शिवाय ई साहित्याच्या विविध वेबसाईटला लाखो लोक व्हिजीट करतात.





*हे साहित्य भारतात तयार झालेले असून ते आता प्रताधिकार मुक्त झाले आहे. भारतीय प्रताधिकार कायदा १९५७ नुसार भारतीय साहित्यिकाच्या मृत्युनंतर ६० वर्षांनी त्याचे साहित्य प्रताधिकारमुक्त होते. त्यानुसार १ जानेवारी १९५३ पूर्वीचे अशा लेखकांचे सर्व साहित्य प्रताधिकारमुक्त होते.*



# कथानुक्रम







# पाखराची गोष्ट

फार वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. दूर दूर असलेल्या एका देशातील ही गोष्ट आहे. एक होता शेतकरी. त्याचे नाव होते खंडू. खंडूची बायको होती. तिचे नाव चंडी.

चंडी नावाप्रमाणेच खरोखर चंडी होती. जणू त्राटिकेचा अवतार. ती सदा संतापलेली असायची. डोळे तारवटलेले, कपाळाला सतराशे आठ्या, घरात अक्षयी तिची आदळआपट चालायची. खंडूला वाईट वाटे; परंतु काय करणार? घर सोडून जावे असे त्याला वाटे; परंतु तेही बरोबर नाही असे त्याची सदसद्विवेकबुद्धी सांगे. 'तुझी गाठ पडली आहे खरी अशा बायकोशी. आता भिऊन पळू नकोस. सहन कर सारे.' असे सदसद्विवेकबुद्धी म्हणे.



चंडी खंडूजवळ कधी एकही शब्द गोड बोलत नसे. ती सदैव त्याच्या अंगावर ओरडायची, त्याला शिव्या द्यायची, हातात लाकूड घेऊन मारायला यायची. प्रत्यक्ष मारीत नसे एवढेच. शेजारी पाजारी तरी का खंडूला सहानुभूती दाखवत होते? नाही. तेही हसत, थट्टा करीत.

कोंबडा आरवताच खंडू उठे. तो शेतावर जाई. चंडी त्याला काहीसुद्धा न्याहारीला देत नसे. ना थोडी चटणीभाकर, ना मूठभर पोहे. बारा वाजेपर्यंत उपाशी पोटी तो शेतात काम करी. नंतर भुकेलेला तो घरी येई.

'आला मेला घरी, इतक्यात कशाला आला? का मरत होता उन्हात? मोठा नाजूक की नाही? नखरे करायला हवेत मेल्याला. अजून भाकर भाजून नाही झाली, तो आला गिळायला. बसा ओसरीत आता. हे दाणे निवडा. नीट निवडा. खंड्या, अरे तुला सांगत्ये मी. घे ते सूप व निवड दाणे. खडा दगड पाहून



ठेव. नवरोजी झालाय नुसता छळायला.

असे सारखे तिचे तोंड सुरू असायचे. खंडू घरी दमून भागून आल्यावरही चंडी जे काम सांगे ते तो निमूटपणे करी. मग जी जाडीभरडी कोरडी भाकर चंडी वाढी ती तो खाई.

'कोरडी भाकर कशी खाऊ?' तो म्हणे.

'तर काय बासुंदी आणू? श्रीखंड आणू? भिकारी तर आहे मेला; परंतु ऐट आणतो राजाची. म्हणे कोरडी कशी खाऊ? मला जात नाही कोरडी म्हणून माझ्यापुरते थोडे कालवण केले आहे. तुला रे काय झाले? भरपूर काम करीत नाहीस वाटते शेतात? ज्याला भूक चांगली लागते त्याला चार दिवसांचे शिळे तुकडेसुद्धा साखरेवाणी गोड लागतात. म्हणे कोरडी भाकर कशी खाऊ? घशाखाली जात नाही वाटते? जरा मुसळ सारा घशात व भोक मोठे करा घशाचे. मी म्हणून ताजी भाकर तरी देत्ये करून. दुसरी कोणी सटवी असती, तर चार दिवस तुला उपाशी ठेवती, शिळे खायला घालती. आपले पाय चेपायला लावती. खा



कोरडी भाकर. सुखाची मिळते आहे भाकर तीसुद्धा उद्या देव नाही देणार, जर असे कुरकुराल तर.' असे ती म्हणे.

ती तोफ एकदा सुरू झाली म्हणजे खंडू घाबरे. मुकाट्याने भाकर खाई व उठून जाई. मग जरा ओसरीत तो घोंगडीवर अंग टाकी. तो ती हिडिंबा लगेच गर्जत येई.

'पडलेत काय पालथे? जा की शेतात. आळशी आहे मेला. खातो व लोळतो. शेतकरी का असा दिवसा झोपतो? उठा जा.'

खंडू आता घरी फार बसत नसे. बहुतेक त्याचा वेळ आता शेतातच जाई. दमला तर तेथेच झाडाखाली पडे. त्या दाट छायेच्या एका झाडाखाली उशाला धोंडा घेऊन तो पडे. झाडावर पाखरे गोड गाणी गात असत. ती मधुर किलबिल ऐकून खंडूला आनंद होई. तो मनात म्हणे,'पाखरे इतके गोड बोलतात. माणसे का बरे गोड बोलत नाहीत? माझी बायको का बरे गोड बोलत नाही? आणि शेजारीही माझा उपहासच का करतात?



एक नवीनच पक्षी एकदा त्याला दिसला आणि पुढे रोज त्याच्यासमोर तो पक्षी येऊन बसे. नाचे. गोड शब्द करी. खंड्डूला आनंद देण्यासाठी का ते सुंदर पाखरू येत असे?
एके दिवशी खंड्डू त्या पाखराजवळ गेला, तो काय आश्चर्य? ते पाखरू पळालं नाही, भ्यायलं नाही. खंड्डूने त्या पाखराला धरले. त्याने ते पाखरू घरी आणले. एका सुंदर पिंजऱ्यात त्याने ते ठेवले.

खंड्डू आता त्या पाखरावर जीव की प्राण प्रेम करी. त्याला ताजी फळे घाली. त्याच्या पिंजऱ्यावर हिरवे पल्लव बांधी, फुले बांधी. मोठ्या पहाटे उठून त्या पाखराला बोलायला शिकवी.
'ये हो खंड्डू. दमलास हो. भागलास हो. बस जरा. मी गाणी गातो. तू आनंदी राहा. मी तुला रिझवीन. मी तुझ्याजवळ गोड बोलेन. मी तुला प्रेम देईन. ये हो खंड्डू.'
असे त्या पाखराला तो बोलायला शिकवी.त्याची ती



कजाग बायको त्या वेळेस झोपलेली असे. बायको जागी झाली की, खंडू शेतावर निघून जाई; परंतु शेतावर गेला तरी त्याला त्या पाखराची आठवण येई. डोक्यावर सूर्य आला की, खंडू आता घरी येई. येताना त्या पाखराला कोवळी कणसे आणी. रानमेवा आणी.

खंडू घरी येताच ते पाखरू पिंजऱ्यात नाचू लागे. गाऊ लागे. ते खंडूचे स्वागत करी व गोड वाणीने म्हणे,

ये हो खंडू.

दमलास हो.

बस हो जरा.

मी तुला गाणे गाईन.

मी गोड बोलेन . ये.

' खंडूला ते गोड शब्द ऐकून आनंद होई. तिकडे बायको बडबडत असली तरी खंडू तिकडे लक्ष देत नसे. पाखराची गोड वाणी ऐकण्यात तो तल्लीन होई.



खंडू आता आनंदी असे. त्याच्या आत्म्याला जणू प्रेमामृताचा चारा मिळाला. त्याच्या मनाला सहानुभूतीचे खाद्य मिळाले. भुकेलेला खंडू तृप्त झाला. बायको त्याला भाकर करून वाढी आणि ते पाखरू प्रेम देई. जगात न मिळणारे दुर्मिळ प्रेम.

एके दिवशी खंडू शेतात गेला.; परंतु पाखराच्या पिंजऱ्याचे दार उघडे राहिले. इकडे ती चंडी उठली. नवरा गेल्यावर ती गोड गोड करून खायची. आज तिने शिरा करण्याचे ठरविले. ताटात रवा काढला. साखर काढली. एका पातेलीत तूप घेतले; तिने सारी तयारी केली इतक्यात अंगणात कोणाची गुरे आली म्हणून त्यांना हाकायला ती गेली. इकडे ते पाखरू पिंजऱ्यातून खाली आले. स्वयंपाकघरात गेले. रव्यामध्ये चोच घालून रवा खाऊ लागले. साखरेत चोच मारून साखरेचे कण त्याने खाल्ले. ते पाखरू मेजवानीत रमले. इतक्यात चंडी आली. तिने ते पाहिले. तिला राग आला. ते पाखरू फडफड करून पिंजऱ्याकडे



जाऊ लागले; परंतु तिने ते पकडले. ते पाखरू धडपडत होते. केविलवाणे ओरडत होते.

'घालशील पुन्हा चोच? घालशील? आणि त्याच्याजवळ गोड गोड बोलायला हवं नाही? मी पिंजऱ्याजवळ आल्ये तर जीभ जशी झडते मेल्याची.

खंड्याजवळ गोड गोड बोलतोस? थांब, तुझी जीभ कापून टाकत्ये. का निखारा ठेवू जिभेवर? नको. कापूनच टाकावी. मग बघत्ये कसा गोड बोलशील तो.'

असे म्हणून तिने खरोखरच कात्री आणली आणि त्या पाखराची चोच उघडून तिने त्याची जीभ कटकन कापली. तुकडा उडाला. पाखराने किंकाळी फोडली. ची ची केले. अरेरे!

त्या पाखराला त्या चंडीने आता सोडले. ते दीनवाणे पाखरू पिंजऱ्यात जाऊन बसले. त्याला वेदना होत होत्या; परंतु कोणाला सांगणार, कशा सांगणार? त्याची वाणी गेली. त्या पाखराच्या डोळ्यांतून पाणी आले.



दुपारची वेळ झाली. खंडूच्या येण्याची ते पाखरू वाट पाहत होते. खंडू आला. कोवळी कणसे घेऊन आला. फुलांचे तुरे पिंजर्‍यावर लावण्यासाठी घेऊन आला.

खंडू पिंजर्‍याजवळ गेला; परंतु पाखरू आज नाचेना, गोड गाणे म्हणेना. 'ये हो खंडू दमलास हो.' असे म्हणेना. का बरे?

'पाखरा, का रे आज बोलत नाहीस? तूही का रागावलास माझ्यावर? आज मला यायला का उशीर झाला? कालची फळे का आंबट होती, कडवट होती? परंतु मी ती खाऊन पाहिली होती. गोड होती ती. हे बघ फुलांचे तुरे आणले आहेत. का रे? आज असा का? आणि हे तुझ्या डोळ्यांत पाणी का? मी तुला पिंजर्‍यात कोंडले म्हणून का तू दु:खी आहेस?तुला का बाहेरच्या स्वातंत्र्याची आठवण झाली? झाडांवर झोके घेण्याची का आठवण झाली? तू वार्‍यावर बाहेर नाचत असशील. झाडांच्या डहाळ्या टाळ्या वाजवीत असतील, तुझ्या नाचण्या



गाण्याला ताल धरीत असतील. होय ना? ते का सारे तुला आज आठवले? का तुझ्या घरची तुला आठवण झाली? तुझी का बायको आहे? तुझी का मुलेबाळे आहेत? कोठे आहे तुझे घरटे? परंतु तुला मी पकडले तेव्हा तू पळाला नाहीस. मला वाटले की, तू माझ्यावर प्रेम करायला आलास आणि खरेच तू आनंदी होतास. आज सकाळी मी जाईपर्यंत तू सुखी होतास! आणि नंतर काय झाले? ती हंडी का तुला बोलली? अरे ती तशीच आहे. तिचे बोलणे नको मनावर घेऊ. बोल. गोड गोड गाणे म्हण. 'खंडू दमलास हो' असे म्हण. तू माझा आधार. तूही का रागावलास? बोल. राजा, बोल. नाच, गा.'

परंतु ते पाखरू मुके झाले होते. थोडीफार हालचाल ते करी; परंतु पुन्हा स्वस्थ बसे. दीनवाणे बसे.

खंडू घरात गेला.

'का गं आज पाखरू का बोलत नाही? तू काय केलेस?




-----------------------------------------------------------

त्याला का शिव्याशाप दिलेस? त्याला का मारलेस? ते खिन्न आहे, दु:खी कष्टी आहे. त्याचे डोळे पुन्हा पुन्हा भरून येतात. तू मला बोलतेस, शिव्या देतेस. त्या मुक्या प्राण्याचेही का मन दुखावलेस? त्यालाही का त्रास दिलास? काय केलेस?'

'काय केले? कापली त्याची जीभ. तुमच्याजवळ गोड गोड बोलते ते पाखरू; मला ते बघवत नव्हते. इतके दिवस मी माझा राग आवरता घेतला होता; परंतु आज त्याने माझ्या भांड्यात चोच घातली. मी जरा बाहेर गेल्ये, तो पिंजऱ्यातून बेटे खाली आले व बसले खात. जणू मेजवानीच होती त्याला. आला मला राग. धरले, घेतली कात्री व कापली जीभ. ठारच मारणार होत्ये, त्याचा गळाच चरचर कापणार होत्ये, परंतु आजच नको म्हटले. बोल म्हणावे आता कसे गोडा बोलतोस ते. मी पिंजऱ्याजवळ कधी गेल्ये तर एक आवाज काढीत नसे. तुम्हाला पाहून ते हसे, नाचे, गाणे म्हणे. माझ्यावर जणू खप्पा मर्जी. टाकली जीभ कापून. खंड्या, आता कोण रे गोड बोलेल तुझ्याजवळ?



त्या पाखराची पूजा करीत होतास. त्याला फुलांचे तुरे आणीत होतास; परंतु माझ्या केसांत घालण्यासाठी आणलीस का कधी फुले?'

'नव्हतो का एके काळी आणीत? परंतु तू ती कुस्करून टाकीत असस. पायांखाली चिरडून टाकीत असस. मग आणणे बंद केले.'

'मी तुझे सत्त्व पाहत होते खंड्या. देवी एकदम नाही प्रसन्न होत. जा त्या पाखराकडे. ते रडतं आहे. तू रड. जा, नीघ.'

खंड्र खरेच पिंजऱ्याजवळ आला. त्या पाखराकडे दु:खाने पाहत राहिला. बराच वेळ विचार करून खंड्र त्या पाखराला म्हणाला, 'पाखरा, तुला मी आज सोडूनच देईन हो. तुला मी आणले हीच चूक. पाखरांची झाडावरच शोभा. झाडांवरचीच त्यांची गाणी ऐकावी. मन रिझवून घ्यावे. उगीचच तुला आणले व कोंडले. आज तिने जीभ कापली, उद्या तुझा गळाही ती कापील. ती राक्षसीण आहे. अगदी राक्षसीण. पाखरा, जा हो. सोड



मला. मी अभागीच आहे. मला एकट्यानेच राहिले पाहिजे. फार तर सृष्टीची दूरून मिळेल ती संगत घ्यावी. फुलांची, पाखरांची, झाडामाडांची, डोंगरकड्यांची,नद्यानाल्यांची, गाईगुरांची दूरून संगत. खरे ना?

होय. ही सृष्टीतील संगत मी घेत जाईन. तुला सोडतो हो आज; परंतु तुझे जातभाई तुला मारणार नाहीत ना? तू दास्यात जिवंत राहिलास म्हणून तुला चोची नाही ना मारणार?

नाही मारणार. कारण तू उपकारासाठी कैदी झालास. एका दु:खी माणसाला आनंद देण्यासाठी तू आपखुषीने आलास. तुझे भाईबंध तुझ्यावर रागावणार नाहीत. तुझे स्वागत करतील. तुझी मुलेबाळे, तुझी बायको तुझ्यावर अधिकच माया करतील. जा पुन्हा प्रेमळ घरट्यात, डोल फांद्यांवर, पोह आकाशात, खा रानचे मेवे. जा हो पाखरा. आज मी मुक्त करीन हो तुला'

असे तो बोलत होता, तो आतून घसरा आला, 'या गिळायला. भाकर झाली आहे.' खंडू गेला.



त्याच्याने आज खाववले नाही. पाखराला आज खाता येत नव्हते. पाखराची जीभ दुखत होती. खंडूला खाणे का गोड लागेल? दोन तुकडे खाऊन तो उठला. पाणी प्यायला. हातात पिंजरा घेऊन तो शेतावर गेला.

त्या गर्द छायेच्या झाडाखाली बसला. त्याने पिंजऱ्यातून ते पाखरू बाहेर काढले. त्याने ते प्रेमाने हृदयाशी धरले. अश्रूंनी त्याला न्हाऊ घातले. पाखराने चोच वर केली. दोन अश्रू ते प्यायले; परंतु ते पाणीही त्याच्या जिभेला झोंबले.

'पाखरा, जा हो आता. जा लांब उडून. येथे शेतावरही नको येऊस. एखादे वेळेस ती येईल. तुला मारील. लांब बनात जा. पूर्वेच्या बाजूला एक बन आहे. त्यात एक सदैव वाहणारा झरा आहे. बांबूची, कळकीची उंच बने आहेत. जा तेथे. सुखात राहा. तुझी मला आठवण आहे. मी तुला विसरणार नाही. माझ्या हृदयात तुझ्यासाठी घरटे आहे. त्या घरट्यात तुझी मनोमय मूर्ती



सदैव राहील. मुकी गाणी ती गाईल हो. जा.'

पाखराला जणू ती वाणी समजली. ते उडाले. पुन्हा एकदा येऊन, खंडूसमोर जरा नाचून, त्याच्या डोक्यावर घिरट्या घालून ते गेले. खंडू पाहत होता. पूर्वेकडच्या बाजूला ते उडाले. ते दमले. एका झाडावर ते बसले. पिंजऱ्यात बसून त्याच्या पंखांची शक्ती कमी झाली होती; परंतु ते पाहा पुन्हा उडाले. निळ्या निळ्या आकाशातून उडत चालले. खंडू पाहत होता. ते पाखरू दिसेनासे झाले. खंडू पुन्हा काम करू लागला.

काही दिवस गेले. काही महिने गेले. एके दिवशी खंडू शेतावर न जाता, पूर्वेकडच्या बनाकडे वळला. ते पाखरू दृष्टीस पडावे, पुन्हा एकदा भेटावे म्हणून त्याचा जीव आसावला होता. ते पाखरू म्हणजे त्याच्या पंचप्राणातील जणू एक प्राण बनले होते.

तो चालला बनातून. झाडांकडे तो पाहतं होता. पाखरांकडे तो पाहतं होता; परंतु ते पाखरू त्याला कोठे दिसेना.

खंडू निराश न होता चालला पुढे आणि तो खळखळ



वाहणारा झरा आला. कसे स्वच्छ स्फटिकासारखे पाणी! जणू वनदेवता त्यात आपले तोंड पाही. वनदेवतेचा जणू तो आरसा. रानातील पशुपक्षांचा जणू तो आरसा!

खंडू त्या झऱ्यातले पाणी प्यायला. त्याच्या काठाने तो पुढे चालला. तिरावर ओलाव्याने रानफुले फुलली होती. नाना रंगांची फुले. पांढरी, पिवळी, निळी, लाल, नाना छटांची, नाना आकारांची. काही चिवटीबावटीही होती आणि ती पाहा फुलपाखरे नाचत आहेत. या फुलावरून त्या फुलाकडे जात आहेत. ती फुलपाखरे फुलांचे संदेश पोहचवीत होती. फुलांचे टपालवाले जणू. का ती फुलपाखरे म्हणजे छोटेपतंग होते? बिनदोरीचे पतंग; परंतु कोण उडवीत होते त्यांना?

खंडू ती सारी मौज पाहतं होता; परंतु तेथे तो थांबला नाही. त्याचे लक्ष फुलांकडे नव्हते. फुलपाखरांकडे नव्हते. झऱ्याकडे नव्हते. ते आपले पाखरू केव्हा कोठे भेटेल असे त्याला झाले होते.



ती पाहा वेळूची बने आली. कळकीची बने, ऊंचच ऊंच. जणू ऊंच वाढलेले रसहीन ऊसच. वारा त्या बनांतून खेळत होता. गोड आवाज येत होता. ते वेळू म्हणजे निसर्गाचे का वेणू होते?

'येथेच असेल ते पाखरू' खंडू म्हणाला. तो चौफेर पाहतं होता. तेथे एका शिलाखंडावर बसला. दुपार होत आली. पाखरे घरट्यात चालली. जरा विश्रांती घ्यायला, पिलांना घास द्यायला ती घरट्यात आली. झाडांवर मंजुळ किलबिल होत होती. अरे, ते पाहा खंडूचे पाखरू. ते पाहा जात आहे. खंडूने शीळ वाजवली, टाळी वाजवली.

'पाखरा ये ये. हा बघ खंडू आला आहे. दमलास का म्हण. ये'

पाखराने ते शब्द ओळखले. ते पाखरू खंडूजवळ आले. ते नाचले. ते गाऊ लागले.

'अरे तुझी जीभ तुटली ना होती? गाणे कसे गातोस? आवाज कसा काढतोस?' खंडूने विचारले.

'माझी वाणी परत आली. इतकेच नव्हे, तर मला



माणसांसारखे सारे बोलता येते. आकार पाखराचा, परंतु तुमच्यासारखे सारे बोलतो. खंडू, तुला पाहून मला खूपच आनंद होत आहे. तू माझ्यावर प्रेम केलेस. आज माझ्या घरी तू आला आहेस. माझा पाहुणचार घे. त्या वेळूच्या बनात आमचे मोठे घरटे आहे. माझी मुलेबाळे तेथे आहेत. बायको तेथे आहे. त्या सर्वांना मी घेऊन येतो. तुझे दर्शन होईल त्यांना. तुझ्या कितीतरी गोष्टी त्यांना मी सांगत असतो. बस हो येथे. जाऊ नको.'

असे म्हणून ते पाखरू उडाले. ते आपल्या घरट्यात गेले. पिले चिव चिव करीत त्याच्याभोवती आली. बायकोने त्याचे स्वागत केले.

'बाबा, बाबा, आज का उशीर केलात? आम्हाला भूक लागली.' पिले म्हणाली.

'खरेच, कोठे गेले होतेत आज लांब फिरत?' बायकोने



विचारले.

'रोजच्यासारखा वेळेवर मी येत होतो; परंतु माझा तो मानव मित्र आज येथे आला आहे. त्या झाडाखाली बसला आहे. त्याच्याजवळ मी बोलत होतो. म्हणून मला उशीर झाला. चला. तुम्हाला मी तो दाखवतो. माझ्यावर त्याचे किती प्रेम. मला शोधीत शोधीत तो आला. आज आधी त्याला जेवण. चला सारी. करू त्याचे स्वागत. येता ना?' पाखराने विचारले.

'हो बाबा चला' पिले म्हणाली.

'चला. मीही त्याला पाहीन.' बायको म्हणाली.

ते पाखरू निघाले. बरोबर पिले होती. पत्नीही आली. सारी त्या खंडूजवळ आली. पिले नाचू लागली. पत्नीने प्रणाम केला.

'ही माझी पत्नी, ही माझी पिले.' पाखरू म्हणाले.

'वा! आनंदी आहे तुझे कुटुंब' खंडू म्हणाला.

'माझी पत्नी गोड बोलते, मी घरी येताच माझे स्वागत करते. पिले माझ्याभोवती नाचतात. मी त्यांना गोड गाणी



शिकवतो. म्हणा रे गाणी. बाळांनो, सोनुकल्यांनो, म्हणा गाणी. खंडूचे स्वागत करा.' पाखराने सांगितले.

पिले गाऊ लागली. मानवी वाणी असलेल्या त्या पाखरानेच ती गाणी रचली होती. सुंदर अर्थाची गाणी. काय होता त्यांत अर्थ?

'जगात नाही मित्र मिळाले तरी सृष्टीत आहेत. आपल्या घरी नाही मिळाले तरी बाहेर आहेत. देवाने आधीच तुम्हाला मित्र दिले आहेत. हे निळे निळे अनंत आकाश. ते नेहमी तुमच्यावरच पाखर घालील. तारे तुम्हाला रमवतील. नद्या पाणी देतील. वारे गाणी गातील. फुले सुगंध व सौंदर्य देतील. वृक्षलतावेली तुमच्यासमोर डोलतील, नाचतील. फार दु:ख नका करू. कोणी शिव्याशाप दिले तरी वाईट नका वाटून घेऊ. या निसर्गाकडे पाहा व आनंदी राहा.'

'आनंद आनंद! हृदयात आनंद असला म्हणजे मन कसे हलके होते! ते मग चिखलात न पडता उंच उंच उडते. देवाजवळ जाते. हसा व देवाजवळ जा. आनंदी व्हा व प्रभूजवळ जा.'



'दु:ख? होय. दु:ख आहे; परंतु ते का आहे? आपणच ते निर्मितो व मग रडतो. चला, दु:ख दूर करू. सर्वांजवळ गोड बोलू. सारे मिळून खाऊ, सारे मिळून राहू. भांडण नको, मत्सर नको. आपल्यासारखेच सारे सुगंध सर्वांना द्या. झाडे आपली फळे देतात. मेघ आपले पाणी देतात. फुले आपला सुगंध देतात. सूर्य प्रकाश देतो. आपणही देऊ. सारे सुखी राहू. म्हणजे मग आनंद होईल!'

अशी ती गाणी होती. एक गाणे तर फारच छान :

'नाचा, नाचा, नाचा.

वाऱ्यावर नाचा.

प्रकाशकिरणांवर नाचा.

लाटांवर नाचा.

डोंगरावर नाचा.

भावनांवर नाचा.

आनंदावर नाचा.



सारी सृष्टी नाचत आहे.

पृथ्वी सूर्याभोवती नाचते.

चंद्र पृथ्वीभोवती नाचतो.

नाच, विराट नाच. नाचा, नाचा.'

'कशी आहेत गाणी?' पाखराने विचारले.

'छान आहेत. आमच्यामध्ये अशी नाहीत आणि तुझी पिले म्हणतातही छान.' खंडू म्हणाला.

'बाळांनो, जा. पळसाची ताजी पाने आणा आणि गोड गोड फळे घेऊन या. खंडूला भूक लागली असेल. जा.' पाखरू म्हणाले.

पिलांनी पळसाची पाने आणली. बायकोने चोचीत धरून रसाळ फळे आणली. पेरू होते. अंजीर होते. पिस्ते होते. रानातील नाना प्रकारचे मेवे होते. त्या पानांवर फळे वाढण्यात आली.

'खंडू, कर फलाहार. पोटभर खा.' पाखरू म्हणाले.

खंडू फळे खाऊ लागला. त्याने त्या पिलांना 'घ्या' म्हटले.



ती म्हणाली, 'नको, मग आम्ही खाऊ.'

'अरे, तुम्ही लहान. घ्या हो.' खंडू म्हणाला.

'घ्या हो.' पाखरू म्हणाले.

पिलांनी पाहुण्यांचा प्रसाद घेतला. फलाहार झाला.

'आता मी जातो. तुला सुखात पाहून मला सुख झाले. मधून मधून येत जाईन.' खंडू म्हणाला.

'जरा थांबा. तुम्हाला एक देणगी देतो. आम्हाला कधी कधी गवताच्या विणलेल्या सुंदर सुबक अशा पेट्या सापडतात; परंतु आम्ही त्या कधी उघडीत नाही. काही जड असतात. काही हलक्या. जा रे बाळांनो. आणा दोन पेट्या. एक हलकी आणा, एक जड आणा.' पाखराने सांगितले.

ती पिले गेली. ती दोन पेट्या घेऊन आली.

'घ्या. हवी असेल ती घ्या.' पाखरू म्हणाले. खंडूने दोन्ही पेट्या हातात घेऊन पाहिल्या. त्याने हलकी पेटी पसंत केली.



'ही हलकीच नेतो. थोडेच बरे. अधिक कशाला? ही जड पेटी ठेवा.' खंड्र म्हणाला.

'त्या पेट्यांतून काय असते ते आम्हांस माहीत नाही. आम्ही त्या उघडीत नाही. आम्हाला फार सोस नाही, हव्यास नाही.' पाखराची बायको म्हणाली.

'बरे येतो, नमस्कार.' खंड्र म्हणाला.

'येत जा, आम्हाला भेटत जा.' ती सर्वजण म्हणाली. खंड्र ती पेटी घेऊन निघाला. पाखरू थोड्या अंतरापर्यंत त्याला पोचवीत आले.

'जा हो पाखरा, तुम्ही अद्याप खाल्ले नाही. जा. असेच प्रेम ठेव. माझी आठवण ठेव.' खंड्र प्रेमाने म्हणाला.

पाखरू परत गेले, खंड्र परत घरी आला.

'आज गेले होतेत कोठे मस्णात? घरी यायचे नसेल तर तसे सांगा. कोठे होती धिंडका? शेतात आज गेला नाहीस ना



खंड्या? घरातून चालते व्हायचे असेल तर तसे सांग. माझा त्रास तरी वाचेल.' चंडी ओरडू लागली.

'अग, आज बनात गेलो होतो; त्या पाखराला भेटायला गेलो होतो.'

'अशी पाखरे भेटतात वाटते? भुतासारखे हिंडत बसलेत वाटते? आणि आता आलात घरी.'

'परंतु पाखरू मला भेटले. त्याला किती आनंद झाला. त्याने माझे स्वागत केले. त्याच्या पिलांनी गाणी म्हटली. त्यांनी मला फळे दिली. किती सुखी त्यांचे कुटुंब आणि ही पेटी मला भेट म्हणून दिली. कशी आहे छान, नाही? ही बघ. दोन पेट्या त्यांनी आणल्या होत्या. एक जड व एक हलकी. म्हणाली, 'वाटेल ती न्या.' मी हलकीच आणली. थोडी तो गोडी. ' तो ती पेटी दाखवून म्हणाला.

'आहे काय त्या पेटीत? असतील किडेबिडे. रद्दी पेटी. गवताची पेटी.'



'परंतु उघडून तरी बघ, थांब मीच उघडतो.' असे म्हणून त्याने ती पेटी उघडली. तो आतून मोत्यांचे सर निघाले. सुंदर पाणीदार गोलबंद मोती! पृथ्वीमोलाचे मोती. टपोरे मोती.

'अहाहा, किती रमणीय ही मोती.' खंडू म्हणाला. चंडी ती मोती मोजीत बसली.

'चांगली आहेत की नाही? आकाशातील जणू तारे तशी ही आहेत.' खंडू म्हणाला.

'परंतु ती जड पेटी का नाही आणलीत? हलकी आणलीत. खंड्या, तुला अक्कल नाही. अगदी दगडूशेट आहेस. जा, ती जड पेटी घेऊन ये.'

'मी जाणार नाही'.

'तू नसशील जाणार तर मी जात्ये. तू घरी स्वयंपाक कर. भाकरी भाज. मी उद्या सकाळी उठून जाईन. मला रस्ता सांग. जाईनच मी. जाणारच. जड पेटी घेऊन येईन. तीत हिरे असतील. रत्ने माणके असतील. सांग रस्ता.'



खंडूने तिला रस्ता सांगितला. दुसरा दिवस केव्हा उजाडतो असे तिला झाले. एकदाची रात्र संपली. बाहेर झुंजूमुंजू होते तोच चंडी निघाली. घरी खंडू होता. आज चुलीजवळ भातभाकरी तो करणार होता. उगीच गेली चंडी. हे बरे नाही, असे त्याला राहून राहून वाटत होते.

चंडी गेली. हिंडत हिंडत दूर आली. ते बन लागले. त्या बनात ती शिरली. ते वेळूचे बन कोठे आहे? तो खळखळ वाहणारा झरा कोठे आहे? रस्ता चुकले की काय? नाही. तो पाहा आला झरा. गाणे गाणारा झरा. सतत वाहणारा, निर्मळ पाण्याचा झरा. चंडी झऱ्याचे पाणी प्यायली. तेथे एका दगडावर बसली.
आता दुपार झाली. पाखरे विश्रांतीला झाडांवर येऊन बसली. वेळूचे बन गजबजले. ते पाहा आपले पाखरू येत आहे. त्याने चंडीला पाहिले. पाखरू चंडीकडे आले.
'आज इकडे कोठे आलात?' त्याने विचारले.



'अरे, तुझी जीभ ना कापली होती मी? तरी बोलतोस?'

'मला देवाने मानवी वाणी दिली, जीभ परत आली. तुम्ही आज माझ्या दारी आल्यात. मला तुमचे स्वागत करू दे. गोड फळे देऊ दे. काही देणगी देऊ दे. बसा येथे.' असे म्हणून ते पाखरू उडत घरी आले.

'बाबा, बाबा, आज पुन्हा उशीर? आज कोण आले? कोण भेटले?' पिलांनी विचारले.

बाळांनो, आज त्या खंडूची चंडी आली आहे.' त्याने सांगितले.

'तुमची जीभ कापणारी चंडी, होय ना?' पिलांनी एकदम संतापून विचारले.

'होय तीच.' त्याने सांगितले.

'बाबा, आम्ही जातो आणि तिचे डोळे फोडतो.' पिले म्हणाली.

'मी जात्ये व तिचे नाक तोडतेय. फोडत्ये तोंड.' बायको म्हणाली.

छी छी, असे नका म्हणू, असे नका करू. मग तिच्यात नि



आपल्यात फरक काय?ती दुष्ट असली तरी आपण दुष्ट होऊ नये आणि ती कशीही असली तरी तिच्या नवऱ्याने माझ्यावर भरपूर प्रेम केले आहे. ती त्याला छळते; परंतु तो सारे सहन करतो. मग आपण नये का सहन करू? चला सारी, पिलांनो गाणी गा. गोड गोड फळे आणा. केळीची पाने तोडून आणा.'

'हिला कशाला केळीचे पान?' बायकोने विचारले

'जो वाईट असतो त्याचेच अधिक स्वागत करावे. त्याला अधिक प्रेम द्यावे. चला, ती वाट पाहत असेल.'

पाखरू आले, त्याची बायको आली. ती पिलेही आली. पिलांनी गाणी म्हटली. बायकोने केळीचे-रानकेळीचे- पान चोचीने तोडून आणले.

'पुरे तुमची गाणी. मला लागली भूक.' चंडी म्हणाली.

'जा रे बाळांनो, फळे आणा.' पाखराने सांगितले.

पिलांनी रसाळ फळे आणली. पानावर वाढली. चंडीने पटापट खाल्ली. तिचे पोट भरले.



'जा रे पिलांनो, त्या दोन पेट्या आणा. एक हलकी आणा, एक जड आणा.' पाखराने सांगितले.

'हलकी नकाच आणू. जडच आणा. त्या जड पेटीसाठीच तर मी आल्ये.' चंडी म्हणाली.

'बरे तर. जडच फक्त आणा. जा लवकर.'

पिलांनी ती जड पेटी आणली. चंडीने ती उचलली. नमस्कार वगैरे न करता, निरोप वगैरे न घेता लगबग ती निघाली.

'या हां बाई.' पाखरू म्हणाले.

'या हां बाई.' बायको म्हणाली.

'या हां बाई.' पिले म्हणाली.

'अडलंय माझं खेटर, झालं माझं काम.' असे चंडी म्हणाली.

धावपळ करीत ती घरी आली. खंडूने स्वयंपाक केला होता. तो वाट पाहतं होता.

'ही बघ आणली जड पेटी. आता बघत्ये उघडून काय काय



आत आहे ते.' चंडी म्हणाली.

'आधी जेव. मग फोड.' खंड्र म्हणाला.

'आधी फोडीन. जेवण काय आहेच रोजचे.'

'नको फोडू ती पेटी. माझे ऐक. ती पेटी तशीच ठेव. मला लक्षण बरे दिसत नाही.' खंडूने सांगितले.

'गप्प बस. तू जा जेवायला. माझे पोट भरले आहे.' असे म्हणून चंडी पेटी फोडू लागली.

तो काय निघाले आतून? काय होते आत? हिरे की माणके? पाचू की पोवळी? हे काय? चंडीने ती पेटी एकदम फेकली. आतून एकदम एक सर्प बाहेर आला. फणा काढला त्याने. दहाचा आकडा. तो सर्प बाहेर पडून मोठा झाला. त्याने चंडीच्या अंगाला विळखे घातले. चंडीला त्याने दंश केले. चंडी मरून पडली. सर्प फूं करीत निघून गेला.

चंडी मेली. खंडू आता एकटा राहिला. त्याने घरातील मोती वगैरे गावातील राममंदिरातील मुर्तींना दिले. खंडू शेतात



खपतो. आनंदात असतो. तो सर्वांना सांगत असतो, 'अती लोभ करू नये. गोड बोलावे. प्रेम द्यावे. द्वेष कराल तर तुमच्या हातात माणिकमोती पडले तरी त्यांचे साप होतील, प्रेम कराल तर सापांचे हार बनतील. पाखरेसुद्धा मानवांवर प्रेम करतात. मानवांनी परस्परांवर करू नये का?'

कंटाळा आला म्हणजे खंडू त्या वेळूच्या बनात जातो. त्या पाखराला भेटतो. तेथे फळे खातो. गाणी ऐकतो. मग घरी येतो. पुढे खंडू वारला; परंतु त्या वेळूच्या बनात गोड गाणी ऐकू येतात. त्या पाखराला मनुष्याची वाणी मिळाली तसे अमर जीवनही मिळाले होते का?

इटुकली मिटुकली गोष्ट ऐकणारांचे अभीष्ट.

****************************************





# जाई

रामजी व राघो दोघे जीवश्चकंठश्च स्नेही, जणू एका घोटाने पाणी पीत, एका प्राणाने जगत. दिसायला शरीरे दोन, परंतु त्यांचे मन एक होते, हृदय एक होते. गावातील सर्वांना त्यांच्या मैत्रीचे कौतुक वाटे.

परंतु काही काही लोकांना ही अभंग मैत्री बघवत नसे. त्या दोघांचे भांडण व्हावे असे त्यांना मनापासून वाटे आणि खरोखरच एके दिवशी तसे झाले.

त्या दिवशी कशावरून तरी गोष्ट निघाली. रामजी व राघो हमरीतुमरीवर आले. एकमेकांचे तोंड न पाहण्याचे त्यांनी ठरवले. राघो जरा मनाने हळवा होता. ज्या गावात आपण इतकी वर्षे परस्पर प्रेमाने वागलो तेथेच इतके भांडलो ह्याची त्याला लाज वाटू लागली. तो घरातून बाहेर पडेना. त्याचे चित्त



कशातही रमेना. खाणे पिणे रुचेना. सुखाची झोप येईना. शेवटी तो गाव सोडून दूर देशी निघून गेला.

राघो आज येईल, उद्या येईल अशी त्याची बायको वाट पाहतं होती; परंतु राघोकडून ना चिठ्ठी ना निरोप. त्याची बायकोही खंगू लागली. ती जेवू लागली म्हणजे नवऱ्याची तिला आठवण येई. पती कुठे असतील, ते जेवले असतील का? असे मनात येऊन तिचे डोळे भरून येत व तिचे जेवण संपे.

असे काही दिवस गेले. राघो परत आला नाही, परंतु त्याच्या मरणाची दुष्ट वार्ता मात्र आली. ती बातमी ऐकून राघोच्या बायकोने हाय घेतली. थोड्याच दिवसांनी तीही देवाघरी निघून गेली; परंतु लहानग्या जाईला आता कोण? ना आई ना बाप. लहान वयात जाई पोरकी झाली.

रामजीने आपल्या मित्राच्या मुलीला आपल्या घरी आणले. जाईची आई अंथरुणावर असता तो समाचारास जात असे. जाईला मी अंतर देणार नाही, असे मरणोन्मुख मातेला त्याने वचन दिले होते. आपण भांडलो म्हणून राघो गेला. राघोचे प्रेम खरोखर थोर. प्रेमभंग त्याला सहन झाला नाही, असे



रामजीच्या मनात येई. मित्रप्रेमाचे ऋण कसे फेडावे? प्रेमाची का फेड करता येते? परंतु मनाचे काही तरी समाधान कृतज्ञता दाखवून मिळत असते. म्हणून रामजीने जाईला जणू आपली मुलगी मानली. तिचे तो सारे करी. तो जणू जाईचा आई-बाप बनला.

जाई चार-पाच वर्षांची होती आणि रामजीचा मुलगा मोहन, तो सात-आठ वर्षांचा होता. जाई व मोहन एकत्र खेळत. मोहन हूड होता. मोठा खेळकर. जाईही तशीच होती. दोघे शेतावर जात. झोल्यावर झोके घेत. कधीकधी घरीही मोहन जाईबरोबर खेळे. तो तिची बाहुली सजवून देई. तिचा खेळ मांडी. तिच्या भातुकलीत भाग घेई. 'मोहन, तू का मुलगी आहेस?' असे कोणी म्हटले की तो निघून जाई.

मोहन व जाई दोघे वाढत होती. दोघे देखणी होती. रामजी आपल्या मनात एक मनोरथ मांडीत होता. तो आपल्या मनात एक गोड स्वप्न रचीत होता. पुढेमागे मोहन व जाई यांचे लग्न लावून द्यावे, छान आहे जोडा, असे त्याच्या मनात येई. आपल्या मृत मित्रासही ह्यामुळे स्वर्गात आनंद होईल असे त्याला



वाटे.

दिवसांपाठी दिवस जात होते. महिन्यांमागून महिने जात होते. वर्षांमागून वर्ष जात होती. मोहन व जाई बहीण-भावाप्रमाणे वाढत होती, निर्मळपणे वाढत होती, निष्पाप वृत्तीने वाढत होती. रामजीची इच्छा त्यांना काय माहीत? रामजीचे गोड स्वप्न त्यांना ठाऊक? रामजीने कधीही तशी शंका त्या मुलांना येऊ दिली नव्हती.

आता मोहन विशीच्या पलीकडे गेला. तो चांगलाच वाढला होता. हाडापेराने मोठा दिसे. अद्याप त्याच्या तोंडावर थोडी कोवळीक दिसत होती. जाईही पंधरा-सोळा वर्षांची झाली. रामजी त्या दोघांकडे बघे व प्रसन्नपणे हसे. तो आता वृद्ध होत चालला होता. आपली इच्छा आपल्या डोळ्यांदेखत पूर्ण करून घ्यावी असे त्याच्या मनात येऊ लागले.

एके दिवशी रामजीने मोहनला हाक मारली.

'काय बाबा? त्याने मोहक वाणीने विचारले.

'मोहन, तू आज्ञाधारक मुलगा आहेस. तू मला फार आवडतोस. आता माझं वय होत आलं. फार दिवस ह्या जगात मी



जगेन असं मला वाटत नाही.' असे म्हणून रामजी थांबला.

'बाबा, असं का म्हणता? तुम्ही आम्हाला पुष्कळ दिवस हवेत, आई कधीच सोडून गेली. तुम्हीही का जाणार? जाईला व तुमच्या मोहनला तुमच्याशिवाय कोण?' मोहन दुःखाने म्हणाला.

'मोहन, आज मी तुला मुद्दाम हाक मारली. माझी एक इच्छा आहे, ती तू पूर्ण कर. किती तरी वर्ष ती इच्छा माझ्या मनात आहे. पित्याची इच्छा पूर्ण करून देशील का त्याला समाधान?' रामजीने विचारले.

'बाबा, तुमच्यासाठी मी काय करणार नाही? सांगा तुमची इच्छा. ह्याच्या आधीच का सांगितली नाहीत ती?' मोहन म्हणाला.

'प्रत्येक गोष्टीची वेळ यावी लागते. बाळ मोहन, तुझं लग्न करावं असं माझ्या मनात येतं, तू आहेस तयार?' पित्याने प्रश्न केला.

'बाबा, आधी जाईचं करा. तुमच्या हातून आधी तिचं लग्न होऊ दे. तिला ना आई ना बाप. तुम्ही तिला आई-बापाची आठवण होऊ दिली नाहीत. तुम्ही तिचं सारं केलंत. तिचे सारे लाड पुरविलेत. आता एवढं आणखी करा.' मोहन म्हणाला.



'तुमचं दोघांचं लग्न मी एकदमच करणार आहे!' रामजी हसून म्हणाला.

'कोणता पाहिलात मुलगा? गरीब असला तरी चालेल; परंतु निरोगी, धडधाकट, प्रामाणिक व श्रमांना न कंटाळणारा असा पाहिला आहे ना? जाईला कोणतं पाहिलंत स्थळ?' मोहनने विचारले.

'नवरामुलगा जवळच आहे. जवळच राहतो. चांगला आहे. देखणा आहे, गुणी आहे.' पिता म्हणाला.

'कुठंसा राहतो?' मोहनने उत्सुकतेने विचारले.

'इथंच' पिता बोलला.

'काय त्याचं नाव?' मोहनची उत्सुकता फारच वाढली.

'मोहन!' पिता शांतपणे म्हणाला.

क्षणभर कोणीही बोलले नाही. तेथे गंभीरता पसरली. पिता-पुत्र विचारात मग्न झाले. पिता पुत्राकडे बघत होता, पुत्र खाली बघत होता.

'अशक्य, अगदी अशक्य.' असे शब्द मोहनच्या कापऱ्या ओठांतून बाहेर पडले.



'काय अशक्य?' पित्याने विचारले.

'मोहनचं जाईशी लग्न होणं अशक्य.' मोहन म्हणाला.

'कोण म्हणतो अशक्य?' पित्याने प्रक्षुब्ध होऊन विचारले.

'मी म्हणतो.' मोहनने निश्चयाने सांगितले.

'मोहन, विचार कर. आतापर्यंत तू माझी कधीही अवज्ञा केली नाहीस. आजपर्यंत माझी आज्ञा पाळलीस. ही आज्ञाही पाळ. वृद्ध पित्याचं मन दुखवू नकोस.' रामजी म्हणाला.

'बाबा, ह्या एका गोष्टीशिवाय इतर काहीही सांगा. कड्यावरून उडी टाकायला सांगा; समुद्रात बुडी घ्यावयास सांगा; विषाचा पेला तोंडाला लावायला सांगा; आगीतून जावयास सांगा; - हा मोहन ते सर्व आनंदानं करील; परंतु ही गोष्ट नको.' मोहन दृढ स्वराने म्हणाला.

'का नको? ज्या दिवशी जाईला मी आपल्या घरी आणलं, त्या दिवसापासून हे स्वप्न मी माझ्या मनात खेळवीत आहे. इतकी वर्षे मनात धरलेली आशा,- ती का तू मातीत मिळवणार? मोहन, माझ्या घरात राहावयाचं असेल तर माझी आज्ञा मानली पाहिजे. माझ्या पित्यानं आज्ञाभंग कधी सहन केला



नाही. तुझा बापही स्वत:चा आज्ञाभंग सहन करणार नाही. मुलानं बापाचं ऐकलंच पाहिजे अशी आपल्या कुळाची परंपरा आहे. ही परंपरा तूही चालव.' रामजी म्हणाला.

'बाबा, जाई व मी बहीण- भावाप्रमाणे वागत आलो. दुसरा विचार कधी मनात आणला नाही. बहिणीजवळ का लग्न लावायला मला सांगता? पिता झाला म्हणून त्याची अपवित्र आज्ञा ऐकायची की काय? पिता थोर आहे. परंतु पित्याहून सत्य थोर आहे. पावित्र्य थोर आहे. कुळाची पवित्र परंपरा चालवावी, अपवित्रता बंद करावी.' मोहन म्हणाला.

रामजीचा संताप अनावर झाला. क्रोधाने तो थरथरु लागला. शेवटी तो मोहनला म्हणाला, - 'तुला एक महिन्याची मी मुदत देतो; तेवढ्या अवधीत काय तो विचार कर. बऱ्या बोलानं मी सांगतो तसं करायला सिद्ध हो, नाही तर ह्या घरातून तोंड काळं करून चालता हो. तू माझा मुलगाच नाहीस असं मी समजेन. मोहन मेला असं मानीन. जा. माझ्यासमोर उभा नको राहूस.'

त्या दिवसापासून मोहन घरामध्ये फारच थोडा वेळ थांबे. जणू घर सोडून जाण्याचा तो अभ्यास करीत होता. तो



कोणाजवळ बोलेना, हसेना, खेळेना. तो खिन्न व उदास दिसे. जाई त्याच्याजवळ जाई व गोड बोलण्याचा प्रयत्न करी. परंतु जाई जवळ येताच मोहन उठून जाई. जाईच्या डोळ्यांत पाणी येई. तिच्या जिवाची तगमग होई.

महिना संपला. पित्याने दिलेली मुदत संपली. एका सदऱ्यानिशी मोहन घरातून बाहेर पडला. सुखात वाढलेला मोहन! तो आता कोठे जाणार, काय खाणार, काय पिणार? तो एका लहानशा झोपडीत राहू लागला. तो मोलमजुरी करू लागला. तो उन्हातान्हातून श्रमे, खपे. कधी गवंड्याच्या हाताखाली काम करी, कधी शेतातील कुंदा खणायला जाई. त्याच्या कोमल हातांना फोड येत, परंतु हळूहळू सवय झाली. हातांना घट्टे पडले. उन्हातान्हात काम करून त्याचा चेहराही जरा राकट बनला.

मोहनने आता लग्न लावले. एका गरीब मजुराच्या मुलीशी त्याने लग्न लावले. तिचे नाव गजरी. मोहन व गजरी गरिबीत स्वर्ग निर्माण करीत होती. गजरीसुद्धा कामाला जाई. दोघे कष्टाने मिळवीत. परस्परांना प्रेम देत. मोहन गजरीला पाणी



आणून देई. तिलाही घरी वेळ असला तर मदत करी. एखादे वेळेस दोघे पहाटे दळीत. मोहन म्हणे, 'ओव्या म्हण.' गजरी गोड ओव्या म्हणे.

मोहनने लग्न लावले ही गोष्ट रामजीच्या कानावर गेली. तो म्हातारा खवळला. त्याच्या तळपायांची आग मस्तकाला गेली. त्याने जाईला हाक मारून सांगितले, 'पोरी, त्या कारट्याकडे खबरदार कधी गेलीस तर. त्याच्याकडे कधी गेलीस असं जर मला कळलं, तर तुलाही हे घर सोडावं लागेल. विचार करून वाग. समजलीस?'

मोहनकडे जावे असे जाईच्या मनात कितीदा तरी येई. परंतु ती जावयास धजावंत नसे. मोहनही आपल्याजवळ धड बोलेल की नाही असे तिच्या मनात येई. ती मनातील दु:ख कोणाजवळ बोलणार? रामजी व मोहन दोघांकडे तिचा जीव ओढे. आपण गेलो तर वृद्ध रामजीस तरी कोण?

जाईचा विवाह लांबणीवर पडला. तिचे लग्न करावे असे जणू रामजीच्या मनात येईना. जाई सासरी गेल्यावर मला म्हाताऱ्याला कोण, असा स्वार्थी विचार त्याच्या मनात



येई. शिवाय जाई मोहनशी जोडलेली आहे, असे स्वप्न आज दहा-बारा वर्षे तो मनात खेळवीत होता.ते स्वप्न आपल्या हातांनी त्याला मोडवेना. जाईचा विवाह दुसऱ्या कोणाशी करण्याचा विचारही त्याला सहन होत नसे. आणि जाई? तिच्या मनातही विवाहाचा विचार येत नसे. तिला रामजीची कीव येई. त्याची ती सेवा- चाकरी कृतज्ञतेने करी.

रामजीच्या घरात धान्याची कोठारे भरलेली होती; परंतु कोण खाणार ते धान्य? तिकडे मोहनला उन्हातान्हात राबावे लागत होते. मेहनतीने भाकर मिळवावी लागत होते. जाईचा जीव खालीवर होई.

मोहन आपल्या वडिलांच्या घरावरून चुकूनही जात नसे. न जाणो, पित्याच्या वैभवाची, त्या घरादाराची, शेतीवाडीची इच्छा मनात उत्पन्न व्हावयाची. त्या बाजूने जाणेच नको. तसेच, स्वतःचा कृश झालेला देह जाईच्या दृष्टीस पडू नये म्हणूनही तो त्या बाजूने जात नसे. रामजी ओटीवर बसलेला असे. आपला मुलगा एक दिवस घरी परत येईल असे का त्याला वाटत होते? मोहनला श्रमाची सवय नव्हती. एकाएकी खूप श्रम



त्याला पडू लागले. मनात दुसरीही दु:खे असतील. तो अशक्त दिसे. गजरी बाळंत झाली होती. तिला आता कामाला जाता येत नसे. मोहनला घरचे करावे लागे, पुन्हा कामावर जावे लागे. तो अगदी थकून जाई.

एके दिवशी फारच दमून-भागून मोहन घरी आला. घरी आल्यावर तो आपल्या लहान मुलाला घेऊन खेळवीत होता. त्या मुलाचे हसे पाहून तो सारे श्रम विसरला; परंतु एकाएकी घेरी येईल असे त्याला वाटले. त्याने बाळ खाली ठेवला. तो पडला. गजरी धावत आली. तिने त्याला सावध केले, अंथरुणावर निजवले. मोहनच्या अंगात सपाटून ताप भरला. गजरी घाबरली. गरीबाला कुठला डॉक्टर? गजरी रडत बसली. मोहन म्हणाला, 'रडू नकोस. तू रडलीस म्हणजे मला वाईट वाटतं. माझ्याजवळ बस. बाळाला घेऊन बस. त्यात मला समाधान आहे.'

मोहनचे दुखणे हटेना. त्याला कामावर जाता येईना. घरात खाण्यापिण्याची पंचाईत पडू लागली. जाईच्या कानांवर या गोष्टी गेल्या. रामजीला न कळत ती मोहनच्या बायकोकडे



मदत पाठवी. कधी दूध, कधी फळे, कधी काही ती पाठवू लागली. मोहन मरणाच्या दारात होता. त्याला भेटण्यासाठी जाईचा जीव तडफडत होता; परंतु ती जाऊ शकली नाही. तिची व मोहनची भेट ह्या जगात जणू पुन्हा व्हावयाची नव्हती. मोहन मरण पावला!

गजरीच्या दु:खाला अंतपार राहिला नाही. तिला कोणाचा आधार? माहेरचे मायेचे तिला कोणी नव्हते आणि सासर असून नसल्यासारखे. आपल्या चिमण्या बाळाला जवळ घेऊन ती रडत बसे; परंतु गरीबाला रडण्याला तरी कोठे पुरेसा वेळ आहे? गरीब मनुष्य काम करील तेव्हा खाईल! परंतु गजरी कामाला तरी कशी जाणार? लहान मुलाला कोठे ठेवणार? त्याला पाठीशी बांधून कामावर गेली असती, परंतु बाळाच्या जिवाला बरेवाईट होईल असे तिला वाटे.

मोहनच्या मरणाची बातमी रामजीला कळली. जाईला कळली. जाई रडरड रडली. एके दिवशी तिने काहीतरी निश्चय केला. रामजीला न सांगता ती गजरीकडे आली. गजरी मुलाला घेऊन बसली होती. जाई म्हणाली, 'वैनी, आपण दोघी एकत्र राहू.



दोघी मिळून ह्या बाळाला वाढवू. कधी तू कामाला जा, कधी मी जाईन.'

गजरी म्हणाली, 'तुम्ही आपला सुखाचा जीव दुःखात का घालता? मामंजी तुम्हाला पुन्हा घरात घेणार नाहीत. आम्ही दुःखात आहोत तेवढं पुरे. होईल कसं तरी आमचं. नाही तर ते गेले तिकडे बाळ व मी जाऊ.' जाईच्या डोळयांना पाणी आले. ती केविलवाणी होऊन काकुळतीने म्हणाली, 'वैनी! नको ग अशी कठोर होऊ. ह्या झोपडीत माझं समाधान आहे. ही गरिबी मला प्रिय आहे. मी सुखात का तिथं होते? वैनी! माझ्या मनाची स्थिती कोणाला माहीत? मी दुर्दैवी आहे. जन्मल्यावर थोड्याच दिवसांत माझे बाबा दूर गेले व मेले. माझी आई मला सोडून गेली. मी ह्यांच्या घरात आले तर इथं पिता-पुत्रांची ताटातूट माझ्यामुळंच झाली. ह्यामुळंच मोहन श्रम करून लवकर मेला. माझा हा पायगुण. मी या साऱ्याला कारण! जन्मताच आईनं माझ्या गळ्याला नख का लावलं नाही? देवानं मला जिवंत तरी का ठेवलं? मला काहीच समजत नाही. मला सुख नको, संपत्ती



नको; मला ऐषआराम नको; मला गरिबीतच राहू दे. तुझ्याजवळच राहू दे. तू मला नाही म्हणू नकोस.'

शेवटी जाई व गजरी एके ठिकाणी राहू लागल्या. लहानगा बाळ वाढू लागला. एके दिवशी जाईच्या मनात विचार आला की, 'म्हातारा रामजी ह्या बाळाला नाही का घेणार? मोहनच्या मरणाने रामजीने वरती दाखविले नाही तरी आतून तो दु:खाने भाजून निघाला होता. मोहनला त्याने घरात घेतले नाही, परंतु या बाळाचा काय आहे अपराध / ह्या बाळाची का आबाळ व्हावी? रामजी ह्या बाळाला आनंदाने घेईल, नातवाला खेळवील, वाढवील, प्राणपणाने जपेल. बाळाला मग दुधा - तुपाला वाण पडणार नाही, कपड्यालत्त्याला कमी पडणार नाही.'

जाईने आपल्या मनातील विचार गजरीजवळ बोलून दाखविले. हो ना करता करता गजरी कबूल झाली. आपला मुलगा दारिद्र्याच्या गारठ्यात कुडकुडावा असे कोणत्या मातेस वाटेल? दारिद्र्यामुळेच मोहन लवकर मेला. हा बाळ तरी शतायुषी होवो असे गजरीला वाटले असेल. ती जाईला म्हणाली, 'मामंजी निग्रही व करारी आहेत. ते बाळाला घेणार नाहीत.



तुम्हाला प्रयत्न करायचा असेल तर करून पाहा. तुम्हाला प्रचीती येईल. माझी ना नाही.'

जाईला आनंद झाला. रब्बीच्या पिकाचा हंगाम होता. गहू तयार झाला होता. शेते सोन्यासारखी पिवळी दिसत होती. रामजीची शेते अपरंपार पीक घेऊन उभी होती. रामजीचा मोहन मरून गेला, परंतु पीक सोळा आणे आले. शेते अशी कधी पिकली नव्हती.

रामजीच्या शेतात कापणी सुरू झालेली होती. खसाखसा विळे चालले होते. कापणारे गाणी म्हणत होते. रामजी एका झाडाखाली बसला होता. देखरेख करावयास, काम करून घ्यावयास तो स्वत: जातीने हजर असे. काम जोरात चालले होते.

जाईने मोहनचा बाळ बरोबर घेतला व ती निघाली. प्रेमळ जाईचा बाळाला फार लळा लागला होता. प्रेम मुलांनाही समजते. रामजीच्या दृष्टीला बाळ पडेल अशी काहीतरी योजना करण्याचे जाईच्या मनात होते. ती शेतावर निघाली. ती एका बांधावर बाळाला घेऊन बसली. लहान झाडाची तेथे सावली होती.



बाळ देखणा होता, मोहक होता. त्याला अधिक मनोहर व मोहक करण्यासाठी जाईने फुलांनी त्याला नटविले. तो बाळ जणू बाळकृष्णाचीच रमणीय मूर्ती आहे असे वाटत होते. जाई त्याच्याकडे पाही व पटकन त्याला पोटाशी धरी, त्याला चुंबी. 'घेतील, बाबा ह्या बाळाला घेतील. त्याच्या कुळातीलच हा मोत्याचा दाणा आहे. त्यांच्या वंशाचेच बीज. किती सुंदर दिसतो आहे! ह्याला कोण घेणार नाही? कोण कौतुक करणार नाही? कोण कुरवाळणार नाही? ह्या बाळाच्या पायाला बोचू नये म्हणून काटे बोथट होती, दगडाची फुले होती. मग बाबा का विरघळणार नाहीत? त्यांचे हृदयही बाळाला पाहून मऊ लोण्यासारखे होईल.'

अशा आशेने जाई त्या बांधावर बसली होती. कामकऱ्यांनी जाईला पाहिले परंतु रामजीला सांगण्याचे त्यांना धैर्य झाले नाही. म्हाताऱ्याचा राग त्यांना माहीत होता. जाई बस बस बसली. शेवटी सांजावले. कामकरी निघून गेले. सूर्य निघून गेला. देव मावळला व अंधार पडला. जाईचा आशासूर्यही मावळला व तिच्या हृदयात अंधार भरला.

दुसऱ्या दिवशी जाई पुन्हा त्या बाळाला घेऊन बांधावर



बसली. कापणारे कापत होते. पक्षी गात होते. जाई बाळाला फुलांनी मढवत होती. तो पाहा रामजी शेते पाहत येत आहे. जाईच्या मनात आशा जागी झाली. धावत जावे असे तिला वाटले; परंतु आला, रामजीच जवळ आला.

रामजीने रागाने जाईकडे पाहिले व तो म्हणाला, 'तू शेवटी त्या घरी गेलीस. तूही त्याच्यासारखीच मर. काढ उपास, कर उन्हात काम. तुमच्या नशिबीच नाही, त्याला कोण काय करणार? सुखाचा घास नाही तुमच्या दैवी. मरा सारी उपासमारीनं व मला म्हाताऱ्याला मात्र खायला जिवंत ठेवा!'

म्हाताऱ्याच्या बोलण्यातील दु:ख व निराशा जाई समजू शकत होती. ती म्हणाली, 'बाबा! तुमचं घर मला बंद झालं हे खरं; परंतु ह्या बाळाला ते का बंद व्हावं? ह्या लहानग्याचा काय अपराध? या मोहनच्या मुलाला तुम्ही नाही का जवळ घेणार, नाही का नीट वागवणार? या बाळाची आबाळ का व्हावी? याला घ्या, तुमच्या घरी न्या. त्याला गरम कपडे करा, त्याला गाईचं दूध पाजा. या बाळाची उपासमार न होवो म्हणजे झालं. हा तुमचाच आहे. तुम्हीच लावलेल्या, वाढवलेल्या झाडाचं हे फळ आहे.'



रामजी ऐकत होता. त्या मुलाकडे तो पाहतं होता. त्याने जरासे तोंड का तिकडे फिरविले? कापणारे कापीत आहेत की नाहीत हे का तो बघत होता? त्याने डोळ्यांवरून हात का फिरविला? घाम का त्याने पुसला? पुन्हा जाईकडे तो वळला. तो बोलेना. त्याच्याने बोलवत का नव्हते? का बोलण्याची त्याची इच्छा नव्हती?

बाबा! घेता ना या बाळाला! घ्या, घ्या, घ्या -' जाई दगडालाही पाझर फुटेल अशा स्वरात म्हणाली.

रामजीचे ओठ हालले. म्हातारा बोलू लागला; परंतु त्याच्याने फार बोलवले नाही. 'दे!' एवढेच तो बोलला. त्याने आपले हात पुढे केले. जाईच्या तोंडावर कृतज्ञतेची कोवळीक होती. तिने बाळ बाबांच्या हातात दिला; परंतु बाळ म्हाताऱ्याजवळ जाईना. तो जाईचा पदर सोडीना. बाळ रडू लागला. त्याच्या डोक्यावरचे हार खाली पडले; परंतु शेवटी जाईने बाळाच्या त्या चिमुकल्या घट्ट मुठी सोडवल्या व ती दूर झाली. रडणाऱ्या मुलाला 'उगी उगी - तो बघ काऊ, ती बघ चिऊ, उगी हां - ही बघ फुलं - रडू



नको असा!' अशा शब्दांनी उगी करीत रामजी निघून गेला. देव मावळला. सांजावले. कामकरी निघून गेले. विळे थांबले. अंधकार पडू लागला. त्या बांधावर जाई तेथेच बसली होती. बाळाच्या डोक्यावरची पडलेली फुले तिच्या हातात होती. ती रडत होती. स्वत:चे सारे जीवन तिला आठवले. रामजीने तिचे किती लाड केले, कसे कौतुक केले, ते सारे डोळ्यांसमोर आली. त्याचे हाल, त्याचे मरण. सारे प्रसंग समोर उभे होते. 'मी दुर्दैवी आहे. खरंच दुर्दैवी. अशा दुर्दैवी माणसांना जन्माला घालण्यात प्रभूचा काय बरे हेतू असावा? परंतु आज बाबांनी बाळ नेला, एवढं तरी सुदैव माझं होतं, एवढं तरी पदरी सुकृत होतं म्हणायचं' असे म्हणत ती उठली व आपल्या झोपडी कडे निघाली. गजरी कामावरून आली होती. पाण्याची घागर तिने भरून आणली व चूल पेटवून ती भाकर भाजीत होई. तो जाई आली. जाईला पाहून गजरी म्हणाली, 'बाळ नाही तो?'

'वैनी, बाबांनी नेला हो बाळ. बरं झालं. बाळ सुखात राहिलं. त्याला थंडी बाधणार नाही, उपास पडणार नाहीत. आपण दोघी कशाही राहू.'



जाईचे शब्द ऐकून गजरी आनंदली नाही. गजरीचा दु:खी चेहरा पाहून जाईला बरे वाटले नाही. तिने बऱ्यासाठी केले होते; परंतु बाळाच्या आईला ते पसंत का नव्हते? मातृहृदय जाईने कसे ओळखावे? तो धन्य अनुभव, पावन व थोर अनुभव माता होऊनच घ्यावा लागतो. जाई माता नव्हती. ह्या जन्मी तरी मी माता होणार नव्हती. अप्रत्यक्ष माता होण्याचे तिचे प्रयत्न होते; परंतु अशा प्रयत्नांनी - दुसऱ्यांची मुले वाढविण्याच्या प्रयत्नांनी- खऱ्या मातेचा अनुभव कसा येणार?

गजरी खिन्न म्हणून जाईही खिन्न झाली. कोणी कोणाशी बोलले नाही. भाकरीचा तुकडा खाऊन दोघी घोंगडीवर पडल्या; परंतु डोळा एकीचाही लागेना. पहाटेचा - प्रहरभर रात्र उरली तेव्हाचा - कोंबडा आरवला. गजरी जाईला म्हणाली, 'आपण बाळ परत आणू. माझा बाळ मामंजींच्या जवळ नको. मी रात्रभर विचार करीत आहे. शेवटी हाच निश्चय मी केला. बाळ परत आणायचा. आपण दोघीजणी जाऊ. तू माझ्याबरोबर ये.' जाई काय बोलणार? मातेच्या इच्छेपुढे ती काय बोलणार? परंतु खरे सांगावयाचे तर बाळ तिकडे गेल्यापासून जाईलाही हुरहूर



लागल्यासारखे वाटत होते. काहीतरी चुकल्यासारखे तिला वाटत होते. तिने फार आढेवेढे घेतले नाही, वादविवाद केला नाही. सकाळ केव्हा होते ह्याची दोघीजणी वाट बघत होत्या. झोप येईना. म्हणून जाते घालून दोघींनी दळले. लहान मुलांवरच्या गोडगोड ओव्या दोघीजणींनी म्हटल्या.

"मांडीवरला बाळ कशी करी दूर माय
प्राण कसा तो ठेवील वासरा ग वीण गाय ‖
तान्हुला ग माझा बाळ नको त्याची ताटातूट
जाग जाई झणी ऊठ त्याची माझी करी भेट ‖"

अशा ओव्या गजरी म्हणत होती. त्या कविता, त्या ओव्या ती स्वत:च रचून  का म्हणत होती? तिच्या हृदयाची का ती हाक होती? तिच्या हृदयाची का ती भूक होती? तिच्या भावनांनी का तिला स्फूर्ती दिली, वाचा दिली?

बाहेर चांगलेच उजाडले. गडी माणसे कामावर जाऊ लागली. सूर्यनारायण सर्वांना हाका मारू लागला; सर्वांना हालववू-नाचवू लागला, हसवू-खेळवू लागला, फुलवू-फळवू लागला. जाई व गजरी दोघी निघाल्या. रामजी आरामखुर्चीत बसून



बाळाला खेळवीत होता. गोड द्यावे व मुलाला घ्यावे, गोड बोलावे व मुलाला घ्यावे. गुळाला मुंगी, मधाला माशी, तशी गोडाला मुले. म्हातारा गोड-गोड बोलत होता -

'काऊ काऊ, चिऊ चिऊ इघे इथे बस, चारा खा, दाणा खा, पाणी पी आणि बाळाच्या डोक्यावरून भुर्रकन उडून जा.'

असे रामजी म्हणत होता. मुलाला त्याने गोडशी वडी दिली होई. बाळ वडी चघळीत होता. रामजीच्या गुंड्यांजवळ खेळत होता. गजरी व जाई दारात उभ्या होत्या. दार लोटण्याचे धैर्य कोणासच होईना. शेवटी जाई पुढे झाली. गजरीने दार लोटले. दोघी न विचारता आत शिरल्या. म्हातारा चकितच झाला. गजरीने बोलायला आरंभ केला. ती म्हणाली, - 'मामंजी! माझा मुलगा परत न्यावयास मी आल्ये आहे. तो तुमच्याकडे नको. तो तुमच्याजवळ तुमच्यासारखाच कठोर होईल, दुष्ट होईल. आई-बापाची आठवण तो विसरेल. आई-बापाविरुद्ध वाटेल ते त्याच्या मनात तुम्ही भरवाल. तो स्वत:च्या आई-बापाचा अपमान करावयास लागेल. छे. नकोच ते. द्या माझा बाळ. तो गरिबीत राहून मेला तरी चालेल; परंतु श्रीमतींत वाढून फत्तर



